वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालयाच्या अखत्यारितील शासकीय वैद्यकीय महाविद्यालये व रुग्णालयांकरीता कोविड-१९ उपाययोजनासाठी जुलै २०२१ च्या पावसाळी अधिवेशनात (२१) सामुग्री व पुरवठा या उद्दिष्टांतर्गत पुरवणी मागणीद्वारे मंजूर निधी वितरित करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः पुमाअ-२०२१/प्र.क्र.२०५/प्रशा-२**

गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार,
गो. ते. संकुल इमारत, ९ वा मजला, मंत्रालय, मुंबई.
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
तारीख: १७ फेब्रुवारी २०२२

वाचा: -

१) **वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालयाचे पत्र क्र. संवैशिवसं/औखक/पुरमागणी/पावसाळीअधि/आय-१/२०२१-२२/८७५३/२१, दि.१७.०६.२०२१.**

प्रस्तावना:-

वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालयाच्या संदर्भ क्र. १ वरील दिनांक १७.०६.२०२१ रोजीच्या पत्रान्वये संचालनालयाच्या २२१० ३३१४ या उद्दिष्टांतर्गत कोविड-१९ व म्युकरमायकोसीस उपाययोजनांतर्गत (२१) सामुग्री व पुरवठा या या उद्दिष्टाखाली रु. १८०.०७ कोटी इतक्या रक्कमेची पुरवणी मागणी सादर करण्यात आली. त्यानुसार वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालयाच्या अधिनस्त असलेल्या शासकीय वैद्यकीय महाविद्यालये व रुग्णालयांना कोविड-१९ च्या उपाययोजनांतर्गत औषधे, सर्जिकल्स साहित्य व अन्य बाबींची खरेदी हाफकिन महामंडळाकडून करण्यासाठी संचालनालयाच्या २२१० ३३१४ या लेखाशिर्षाखाली (२१) सामुग्री व पुरवठा या उद्दिष्टांतर्गत जुलै-२०२१ च्या पावसाळी अधिवेशनात सन २०२१-२२ या वित्तीय वर्षासाठी बाब क्र. ११६ अन्वये एकूण रु. १८०.०७ कोटी इतक्या रक्कमेची पुरवणी मागणी मंजूर करण्यात आली आहे. सदर एकूण मंजूर निधीपैकी यापुर्वी वित्त विभागाने २५% च्या प्रमाणात रु. ४५.०० कोटी इतका निधी वितरित करण्यात आला होता. आता उर्वरित निधी वितरणाचा प्रस्ताव वित्त विभागास सादर केला असता, वित्त विभागाने उपरोक्त पुरवणी मागणीद्वारे मंजूर निधीपैकी यापुर्वी वितरित करण्यात आलेला निधी वगळून रु. ५०.०० कोटी एवढा निधी वितरित करण्यास वित्त विभागाने मान्यता दिली असून, सदर निधी संचालनालयाच्या २२१० ३३१४ या लेखाशिर्षाखाली वितरित करण्याची बाब विचाराधीन होती. त्यानुसार आता खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय-**

वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालयाच्या अधिनस्त असलेल्या शासकीय वैद्यकीय महाविद्यालये व रुग्णालयांना कोविड-१९ च्या उपाययोजनांतर्गत औषधे, सर्जिकल्स साहित्य व तद्नुषंगिक बाबींची खरेदी हाफकिन महामंडळाकडून करण्यासाठी संचालनालयाच्या २२१० ३३१४ या लेखाशिर्षाखाली (२१) सामुग्री व पुरवठा या उद्दिष्टांतर्गत जुलै-२०२१ च्या पावसाळी अधिवेशनात सन

२०२१-२२ या वित्तीय वर्षासाठी बाब क्र. ११६ अन्वये एकूण रु. १८०.०७ कोटी इतक्या रक्कमेची पुरवणी मागणी मंजूर करण्यात आली आहे. उपरोक्त मंजूर निधीपैकी यापुर्वी वित्त विभागामार्फत २५% च्या प्रमाणात रु. ४५.०० कोटी निधी अर्थसंकल्पिय निधी वितरण प्रणालीवर उपलब्ध करून दिला आहे. आता या आदेशान्वये रु. ५०.०० कोटी एवढा निधी वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालयाच्या २२१० ३३१४ या लेखाशिर्षाखाली वितरित करण्यास व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त प्रमाणे एकूण रु.५०.०० कोटी (अक्षरी रुपये पन्नास कोटी रुपये केवळ) एवढा निधी अर्थसंकल्पिय निधी वितरण प्रणालीवर वितरित करण्यात आला असून विभाग प्रमुख/ नियंत्रक अधिकारी यांनी सदर तरतूद खर्च करतांना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका यामधील वित्तीय नियमांचे काटेकोरपणे पालन करावे.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.५६/२०२२/व्यय-१३, दिनांक ०९.०२.२०२२ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करयात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०२१७१२४१२२९११३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MAHADEO JOGDAND

Digitally signed by MAHADEO JOGDAND
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0477d837dc0b00fc2cbd45d17d07c625c3417378f97d493a8a277faa29f65459, pseudonym=85719993A847361CF1CE96786397786A408A4972, serialNumber=C1D08CFDEE92DA209D709F5456D9EDE95236B8A8E7E2A2801B8FED03DCF793D3, cn=MAHADEO JOGDAND
Date: 2022.02.17 14:36:18 +05'30'

**(म. गि. जोगदंड)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा. मंत्री, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. राज्यमंत्री, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. सचिव, शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग यांचे वरिष्ठ स्विय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
४. आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई.
५. संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई.
६. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र ½, नागपूर/मुंबई.
७. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
८. वित्त विभाग (व्यय-१३), मंत्रालय, मुंबई.
९.निवडनस्ती (प्रशा-२), वैद्यकीय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.